**नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट-अ व गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकारी यांच्या गोपनीय अहवालांच्या संस्करणाबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन आदेश क्र. गोअप्र-५५१६/१८९५/प्र.क्र.३२६/२०१६/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०४ फेब्रुवारी, २०१७.

वाचा :- १. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.सीएफआर-१२१०/प्र.क्र.४७/२०१०/तेरा, दि.०१.११.२०११.
२. आपले पत्र क्र.आस्था/न.र./गो.अ.२०१५-१६/संस्करण/प्र.१अ/४५५, दि.१८.११.२०१६.

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन, दि.०१.११.२०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये शासकीय अधिकारी / कर्मचाऱ्यांचे गोपनीय अहवाल लिहिणे, जतन करणे व संस्करण करणे या संदर्भात सविस्तर मार्गदर्शक सूचना व आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. उक्त शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेता, नगर विकास विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील गट "अ" व गट "ब" (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालांचे संस्करण करण्याकरिता अधिकारी / कर्मचाऱ्यांची नेमणूक करण्याची बाब विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत.

**आदेश :-**

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील विविध संवर्गातील ज्या अधिकारी / कर्मचाऱ्यांचे गोपनीय अहवाल थेट संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे हे प्रतिवेदन / पुनर्विलोकन करतील, अशा गोपनीय अहवालाच्या संस्करणाचे प्रस्ताव प्रशासकीय विभागास सादर करण्यात यावेत.

**०२.** परिच्छेद-१ मधील अधिकारी / कर्मचारी वगळता अन्य सर्व अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या गोपनीय अहवालांचे संस्करण नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या स्तरावर करण्यात यावे.

**०३.** या प्रयोजनासाठी अधिकारी / कर्मचारी यांच्या विविध प्रवर्गासाठी संस्करण अधिकारी / कर्मचारी म्हणून विशिष्ट अधिकारी / कर्मचारी यांना पदनामाने घोषित करण्याबाबत संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

**०४.** नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या स्तरावरील गोपनीय अहवालांच्या संस्करणामध्ये त्रुटी राहिल्यास त्याची नेमकी जबाबदारी निश्चित करण्यात यावी.

**०५.** नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या गोपनीय अहवालांच्या संस्करणाबाबत शासनामार्फत निर्गमित करण्यात आलेल्या व भविष्यात निर्गमित होणाऱ्या शासन निर्णयातील तरतुदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

**०६.** संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरहू शासन आदेशाबाबत त्यांच्या अधिनस्त सर्व क्षेत्रिय कार्यालयांना तसेच सर्व संबंधित प्राधिकरणांना अवगत करण्यात यावे.

**०७.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०१७०२०४१११६१७१५२५ असा आहे. हा शासन आदेश डिजिटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Samadhan Khatkale

Digitally signed by Samadhan Khatkale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3cc48a0aa3fbc01f7ee956a75c9445a5b81fec5e429c69234939d35b4eaceee0, cn=Samadhan Khatkale
Date: 2017.02.22 13:01:15 +05'30'

**( समाधान खटकाळे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत :-**

१. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. संचालक, नगर रचना तथा सह सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. संचालक, नगर रचना तथा मुख्य नियोजक, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई.
४. उप सचिव (आस्थापना), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व सह संचालक, नगर रचना,
६. सर्व उप संचालक, नगर रचना,
७. सर्व सहायक संचालक, नगर रचना,
८. सर्व नगर रचनाकार, शाखा कार्यालये,
९. मा. प्रधान सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक.
१०. मा. प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक.
११. निवडसंग्रह / नवि-२७.

*****